**लोकमान्य बाळ गंगाधर टिळक : नेतृत्वाची उभारणी**

**पुढारीपणाच्या राजकारणाचे दूरगामी सामाजिक परिणाम**

**वसंत पळशीकर**

१८८० साली लोकमान्यांनी सार्वजनिक क्षेत्रात पाऊल टाकले तेथपासून त्यांचा उत्कर्ष कसकसा होत गेला आणि अखेरीस १८९८ साली अखिल भारतीय पुढाऱ्यांमध्ये त्यांनी मानाचे स्थान कसे संपादन केले हे आपण काहीशा तपशीलात जाऊन पाहिले. प्रामुख्याने त्यांच्या स्वतःच्या निवडक लेखांचे प्रसिद्ध झालेले दोन संग्रह (भाग १ व भाग ४) आणि केळकरकृत टिळकचरित्र यांच्या आधारेच ही तपासणी केली. या सीमित तपासणीतूनही ज्या चारदोन ठळक गोष्टी लक्षात आल्या त्या पुढीलप्रमाणे सांगता येतील.

देशसेवकांची फौज निर्माण करणाऱ्या शाळा-कॉलेजच्या उभारणीसाठी आपले सारे आयुष्य वेचायचे असे टिळकांनी आपल्या मनाशी ठरविले होते. वर्तमानपत्रे ही काहीशी मागाहून आली व ती चालू करण्यात टिळकांपेक्षा इतरांचाच उत्साह व पुढाकार कदाचित अधिक होता. डेक्कन एज्युकेशन सोसायटी ही संस्था रीतसर स्थापन झाल्यावेळपासून आजीव सभासदांमध्ये तट पडले. भांडणाची प्रासंगिक कारणे बाजूला करून मुळात वाद कशासंबंधी होता असे पाहिले तर भांडण विकोपाला जाण्याच्या मुळाशी दोन परस्परसंबद्ध कारणे होती असे दिसते. राजमान्यतेचे स्वागत करून, प्रतिष्ठितपणाच्या सुखसोयींचा व मर्यादांचा स्वीकार करून सोसायटीचे काम चालविण्याकडे बहुसंख्य सभासदांचा कल होता, तर शाळेच्या उपक्रमामागील मुख्य राजकारणी उद्दिष्ट यात हरवले जात आहे व हे घडून येता कामा नये असा टिळकांचा आग्रह होता. आपल्याला नेमके काय बोचते आहे व ते कशाकरता बोचते आहे ते टिळकांनाही स्पष्ट होते की नाही हे सांगता येत नाही. कारण त्यांच्या राजीनाम्याच्या पत्रात जवळपास सर्व भर स्वार्थत्यागाच्या व ' बाहेरची कामे करण्या-न-करण्याच्या दोन मुद्द्यांवरच दिलेला आढळतो. टिळकांनी उपस्थित केलेले मुद्दे उघडच चुकीचे होते. सोसायटीतले भांडण विकोपाला गेले ते यातूनच उद्भवलेल्या एका मुद्द्यामुळे. सोसायटीचे कामकाज आपल्या तंत्राने चालावे कारण आपण 'मूलतत्त्वांवर' ठाम आहोत हा टिळकांचा पुढे मुद्दा बनला. बहुसंख्य आजीव सभासदांनी टिळकांचे म्हणणे अमान्य केले. टिळकांना सोसायटी सोडणे भाग पडले.

ही ताटातूट टिळकांना देहदंडाच्या शिक्षेसारखी वाटली आणि ज्यांच्यामुळे त्यांना आपल्या जीवितकार्यापासून फारकत घ्यावी लागली, त्यांच्याविषयी जबरदस्त शत्रुत्वाची भावना मनात बाळगूनच टिळक बाहेर पडले. तपासणीतून हाती आलेली ही पहिली ठळक गोष्ट म्हणता येईल.

अपार प्रेम आणि कडवा द्वेष या एकाच नाण्याच्या दोन बाजू असतात हा मानसशास्त्रज्ञांचा नित्याचा अनुभव आहे. टिळकांच्या बाबतीत द्वेष हा शब्द वापरता येत नाही यातच टिळकांची थोरवी प्रत्ययास येते. पण एकमेकांच्या मनात खोल अढी निर्माण होण्यात या सर्व भांडणाची परिणती झाली ही गोष्ट स्पष्ट आहे. शिवाय गोखल्यांशी आमचे आजपर्यंत जे प्रसंग झाले त्यामुळे एकमेकांच्या मनात एकमेकांविषयी ज्या अढी पडल्या आहेत..." असे उद्गार

टिळकांनी, पहिल्या राजद्रोहाच्या खटल्याची शिक्षा भोगून परतल्यावर, आपल्याजवळ काढल्याची आठवण श्री. शंकर गणेश लवाटे यांनी सांगितलेली आहे.[१] आगरकर व गोखले यांच्याही मनांतली टिळकांविषयीची अढी अखेरपावेतो गेली नाही. या बाबतीत अपवाद रानड्यांचाच दिसतो. ही जी अढी व शत्रुत्वाची भावना घेऊन टिळक बाहेर पडले तिचा परिणाम यानंतरच्या काळात दिसून येतो. पुढारीपणासाठी टिळकांनी जो झगडा केला तो त्यांना एरवीही करावा लागला असता. पण त्याने जे विशिष्ट रूप धारण केले, त्या ओघात जे डावपेच ते खेळले त्यातून ही भावना दृग्गोचर होत राहिली.

'आधी राजकीय की आधी सामाजिक?' या वादात प्रत्यक्षात एक वैयक्तिक भांडणही मिसळलेले होते, आणि त्यामुळे टिळकांनी विचारांती पटलेल्या मूळ भूमिकेशी विसंगत, तिला विघातक अशी भूमिका घेतली ही हाती आलेली दुसरी ठळक गोष्ट होय. या बाबतीत जयकरांचा दाखला देण्यासारखा आहे. स. वि. बापटांनी संपादित केलेल्या आठवणींच्या दुसऱ्या खंडात जयकर लिहितात, “ I often felt that his early conflict with the cause of reform as advocated by an exponent of a totally different scheme of life from his, was a great misfortune. In the case of such men it is true than others, that acting ends by adopting. (हे अधोरेखित माझे) Much of the apparent aversion to social progress and reform, which one observed in his writings, seemed to me to be the outcome of the narrow personal schism, which he encountered at an early stage, in the intensifying atmosphere of the city his strong likes and dislikes."?[२] आगरकर गोखले पक्षाशी उपस्थित झालेल्या भांडणाचा भाग म्हणून निवडलेली भूमिका अखेरीस सार्वजनिक रीत्या घ्यावयाची भूमिका म्हणून टिळकांनी कायम केली. टिळकांचा हा दुसरा निर्णयमात्र त्यांनी केवळ भांडणाचा भाग म्हणून केला नाही, तर विचारपूर्वक केला.

सोसायटीच्या भांडणात आगरकरांना पड खावी लागली असती किंवा दोन पक्षांत सन्मान्य तडजोड होऊन दोघेही सोसायटीत राहिले असते तर टिळकांना पूर्ववत आपल्या 'स्वसंस्कृतीचे अभिमानी पण सुधारक’ या खऱ्या वैयक्तिक भूमिकेवर सार्वजनिकरीत्याही येण्यास फारसा वेळ लागला नसता. भांडणाच्या गदारोळात निर्माण झालेली विसंगती दूर झाली असा त्याचा अर्थ झाला असता. याउलट आपली वैयक्तिक जीवनातली - आचरणातली व तात्त्विक भूमिका एक असताना पुढारी व केसरीचा संपादक म्हणून विसंगत अशी दुसरीच विरोधी भूमिका टिळकांना आयुष्यभर वठवावी लागली असे आपण पहातो. म्हणूनच सार्वजनिक जीवनात सुधारक व सुधारणाविरोधी भूमिका घ्यावयाची हा निर्णय टिळकांनी विचारपूर्वक घेतला अशा निष्कर्षावर यावे लागते. तत्कालीन पुण्यात (महाराष्ट्रातही ) रानडेपक्षास शह द्यावयाचा, त्यावर मात करावयाची तर सनातन्यांच्या फौजफाट्याची प्रभावी व परिणामकारक मदत घेणे सोयीचे आहे, किंबहुना तेच एक अमोघ अस्त्र आहे हे दिसून आल्यावर हा निर्णय टिळकांनी प्रथम घेतला असे त्यावेळच्या घडामोडी लक्षात घेता दिसते.

१८९०च्या ऑक्टोबरात टिळकांनी सोसायटी सोडली. वामन मल्हार जोश्यांनी आपल्या आठवणींत टिळकांच्या

संभाषणाचा आशय दिला आहे तो येथे लक्षात घेण्यासारखा आहे आगरकर - गोखले व टिळक यांची मने परस्परांबद्दल कलुषित का असावीत हा प्रश्न त्यांनी टिळकांजवळ काढला असताना टिळक जे म्हणाले त्याचा त्यांनी दिलेला आशय असा आहे: " वामनराव, हा प्रश्न केवळ युक्तिवादाचा नाही; ... आपल्या नरडी दाबणाऱ्या प्रतिपक्षाशी झुंजताना मनाचा समतोलपणा अंगीकृत कार्याला अडथळा करणाऱ्या किंबहुना त्या कार्याची राखणे कोणालाही कठीणच जाते. आपणाला अत्यंत प्रिय व पूज्य असलेले कार्य जीवितसंशयात जो आणतो त्याच्याशी सख्य राखणे अशक्य नसले तरी फार कठीण आहे."[3] आगरकर-गोखले व पर्यायाने रानडे-भांडारकर यांच्याविषयी कोणती भावना टिळकांच्या ठिकाणी सोसायटी सोडतेवेळी असेल याची यावरून कल्पना करता येते. सोसायटीतून आपणास हुसकवणाऱ्या या आपल्या प्रतिपक्षीयांना खडे चारण्याची जबरदस्त ईर्षा टिळकांच्या ठिकाणी उत्पन्न झाली असली तर ती गोष्ट त्यांच्या युयुत्सु स्वभावाला शोभेशीच म्हटली पाहिजे. हे एक प्रकारे वैयक्तिक भांडण होते. पण ते टिळकांनी समाजकारण व राजकारण यांच्या सार्वजनिक रणांगणावर उचलले व त्याला व्यक्तिनिरपेक्ष असे परिमाण प्राप्त करून दिले यात टिळकांचे वैशिष्ट्य दिसून येते. सोसायटी सोडता सोडताच संमतिवयाच्या बिलावरूनचा वाद ऐन भरात आलेला होता. याच वादाचे वेळी सनातन्यांच्या फौजफाट्याने सुधारकांची पुण्यात व मुंबईत धुळधाण उडविली. या घटनेपासून टिळकांनी आवश्यक तो बोध घेतला असे म्हणता येते.

राजकीय कार्याच्या गरजा ध्यानी घेऊन सामाजिक सुधारणेविषयीची एक विशिष्ट भूमिका टिळकांनी अंगिकारिली हे खरे नसून नेतृत्वाच्या संघर्षातल्या प्रतिपक्षाला डोळ्यापुढे ठेवून बुद्ध्या निवडलेली साधनरूप अशी ती भूमिका होती ही तपासणीच्या अंती हाती आलेली तिसरी ठळक गोष्ट होय. सनातनी धर्माचे व कर्मकांडाचे पुनरुज्जीवन करणे हे टिळकांचे कधीच ध्येय नव्हते. प्रतिपक्षाला नामोहरम करण्यासाठी धर्म व संस्कृतिरक्षकाचा पेहराव सोयीचा होता एवढेच. पुण्यात, महाराष्ट्रात व भारतात सुधारक व नेमस्त हाच टिळकांचा प्रतिपक्ष राहिला आणि म्हणून आयुष्यभर त्यांना आपली ही भूमिका वठवीत रहावे लागले. तिचे फायदे लक्षात घेऊन त्यांनी ती कौशल्याने वठविलीही. या भूमिकेने टिळकांना झटपट यश - म्हणजेच पुढारीपण - मिळवून दिले. त्यांच्या उत्कर्षाचा आलेखही आपण पाहिला. महाराष्ट्रात तरी त्यांना इतके यश मिळाले की रानड्यांच्या पश्चात गोखल्यांनी आपले कार्यक्षेत्र महाराष्ट्राबाहेरच ठेवले. एक प्रकारे त्यांनी टिळकांची धास्तीच घेतली. टिळक हे महाराष्ट्राचे अनभिषिक्त सम्राटच बनले.

राजकीय स्वातंत्र्याच्या लढ्यास गती प्राप्त करून देण्यात महायुद्धोत्तर काळात टिळकांचा वाटा सिंहाचा होता. या क्षेत्रातले त्यांचे पुढारीपण इतके तेजस्वी व पराक्रमी होते की ज्या युद्धनीतीचा वापर करून त्यांनी आपल्या पुढारीपणाची उभारणी केली तिचे व्यापक सामाजिक-राजकीय परिणाम ध्यानी घेण्याचा विचारही अद्याप मोकळेपणाने होऊ शकत नाही. पण त्याचाच विचार येथे थोडा करावयाचा आहे.

अव्वल इंग्रजीत सुरुवातीस काही काळ हिंदुस्थानातील लोकांची धार्मिक व सामाजिक सुधारणा घडवून आणण्याची ईर्षा व उमेद इंग्रज राज्यकर्त्यांनी बाळगली होती. पण त्याही काळात मुंबई इलाख्यात एलफिन्स्टनचे धोरण अतिशय सावधगिरीचे होते. मराठी मुलखातील सरदार - वतनदार - इनामदार वर्ग व येथील ब्राह्मण वर्ग यांना चुचकारून घेऊन

आपले राज्य स्थिर करण्याचे त्याचे धोरण होते. अशी तात्त्विक भूमिका असूनही इंग्रजी न्यायपद्धती, कायदेकानून व प्रशासकीय पद्धती यांच्यामुळे सामाजिक-आर्थिक स्थित्यंतर मोठे घडून यावयाचे ते आलेच. प्रस्तुत संदर्भात मुद्द्याची गोष्ट अशी की, शिक्षण व सरकारी नोकरी यांच्या क्षेत्रात उच्चवर्णियांना न दुखविण्याच्या धोरणापायी कनिष्ठ, विशेषतः अस्पृश्यजातियांना दारे बंद करण्यात आली. इंग्रजी राज्यात शिपाईगिरीचा पेशा उरला नाही त्यामुळे गावोगावच्या मराठे कुटुंबांचा ऱ्हास झाला. इंग्रजी शिकेल त्याला सरकारी नोकरीचे क्षेत्र खुले झाले खरे; पण येथील पारंपरिक रचनेचा परिणाम म्हणून उच्चवर्णीयच- महाराष्ट्रांच्या संदर्भात प्रामुख्याने ब्राह्मणवर्ग - इंग्रजी शिक्षणाकडे वळले व त्यांचीच तेवढी भरभराट झाली.

सुधारणेचा विचार नवशिक्षित उच्चवर्णियांमध्येच प्रामुख्याने प्रथम उदय पावावा ही गोष्ट स्वाभाविक होती. पण सुधारणेचे वारे उच्चवर्णीय समाजाच्या बाहेरही खेळावयाचे, जातिभेदांच्या तटबंदी ढासळायच्या तर शिवाशिवीच्या तत्त्वावर अधिष्ठित असलेले ब्राह्मणी धार्मिक कर्मकांड, तज्जन्य सामाजिक रीतिभाती आणि या कर्मकांडावर पोसणाऱ्या ब्राह्मणी धर्माचे व धार्मिकांचे वर्चस्व धार्मिक व सामाजिक क्षेत्रातून मोडून काढण्याची आवश्यकता होती. मुंबईसारख्या सबगोलंकार नगरीतही हे काम सोपे नव्हते, पण निदानपक्षी तेथे सुधारकांना इतर जातिजमातींमधील सुधारकांचा मोठा पाठिंबा होता. पुण्यासारख्या शहरांतून हे काम किती तरी अधिक कठीण होते.

या वर्चस्वावर, कर्मकांडावर, रीतिभातींवर पहिला मोठा वैचारिक हल्ला लोकहितवादींनी केला. पण त्यांची शतपत्रे प्रसिद्ध झाली तेव्हा समाज अद्यापि पेशवाईच्या सावलीतच वावरत होता. सुधारणेचे प्रत्यक्ष कार्य रुजण्यासाठी नवशिक्षितांची संख्या पुरेशी असणे आवश्यक होते. रानड्यांच्या काळी अशी अनुकूलता निर्माण झाली होती व तिचा त्यांनी मोठ्या कौशल्याने उपयोग करून सुधारणेचे कार्य नाना आघाड्यांवर संघटित केले. पण त्यांच्याही काळात सुधारणेचे वारे मुख्यतः नवशिक्षित ब्राह्मणांमध्येच खेळत होते. आणि स्वतःच्या आस्तेकदम कार्यपद्धतीला अनुसरून सुधारणेचे आपले कार्य त्यांनी जवळपास सर्वस्वी ब्राह्मणांपुरतेच सीमित राहू दिले.

अशा वेळी महाराष्ट्रात एक अद्भुत गोष्ट घडून आली. जोतिबा फुल्यांचा अवतार ही ती अद्भुत घटना होय. लोकहितवादी 'प्रभाकरा'तून शतपत्रे लिहीत होते त्यावेळी फुल्यांनी आपले कार्य पुण्यात सुरूही केले होते ही गोष्ट लक्षात घेतली तर, जे घडले ते किती अद्भुत होते हे ध्यानात येईल. बहुजनसमाजात सुधारणेचे लोण जोतिबांनी पोचविले होते. जोतिबांच्या कामाचा परिचय रानड्यांना असावा असे दिसते. ब्राह्मणांपलीकडील जातिजमातींमधील राजकीय हक्कप्राप्तीच्या व सामाजिक सुधारणेच्या प्रयत्नांना रानड्यांचे प्रसंगोपात्त सहाय्यही होते असे दिसते. पण समाजातील तटबंदींचा तत्कालीन भक्कमपणा ध्यानात घेऊन त्यांनी या साऱ्या चळवळींना एका प्रवाहात आणून मिळविण्याचे काम केले नाही ही गोष्ट उरतेच.

ऐतिहासिक गरज मात्र ती होती. या ऐतिहासिक गरजेची पूर्तता रानड्यांनी केली नसली तरी तसे घडून येण्याच्या आड येणारी त्यांची भूमिका नव्हती. पण विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या रूपाने महाराष्ट्राचे दुर्दैव आड आले. धर्म, संस्कृती व

इतिहास या तिन्ही क्षेत्रातील उज्ज्वल भूतकाळाचे स्मरण करून देऊन, त्यांच्या अभिमानाच्या अधिष्ठानावर एका नवशिक्षित पिढीची मानसिक घडण त्यांनी केली. या कामगिरीच्या विधायक पैलूवर आवश्यक तो भर आजवर दिला गेला आहेच. कोणत्याही लोकांचा अभ्युदय घडून येण्यासाठी त्या लोकांच्या पाठीचा कणा स्वाभिमानाने व आत्मप्रतिष्ठेने ताठ व्हावा हे आवश्यक असते. पण हेही खरे की हा सर्व ब्राह्मणांचा धर्म, त्यांची संस्कृती, व त्यांचा इतिहास (खरा तसाच खोटा) होता आणि त्याने ब्राह्मणांना अतिरिक्त आत्मगौरवाच्या भावनेने आंधळे केले. भविष्याला अर्थपूर्णरीत्या सामोरे जावयाचे असल्यास मूलगामी आत्मसुधारणा आवश्यक आहे, आपली मिरासदारी संपुष्टात आणून हा समाज एकरस करण्याची गरज आहे याचे भान केवळ सुटले असेच नाही तर सर्व समाजाचे पुढारीपण करण्यास, राजकीय-सामाजिक सत्ता उपभोगण्यास व राबविण्यास, शिक्षण घेण्यास व नोकऱ्याचाकऱ्या करण्यास आपणच तेवढे लायक आहोत हे इतिहासानेच सिद्ध केले आहे असा एक अहंकार दृढमूल झाला. हा अहंकार 'वाघिणीचे दूध' प्यालेल्या नवशिक्षितांमध्ये रुजला ही अधिक गंभीर बाब होती.

विष्णुशास्त्र्यांना टिळकांसारखा अनुयायी न लाभता तर त्यांच्या शिकवणुकीतल्या विध्वंसक, विघातक बीजांचे मोठे वृक्ष झाले नसते. प्रथम सोसायटीतील आपल्या प्रतिपक्षाला नामोहरम करण्यासाठी आणि नंतर आपले पुढारीपण प्रस्थापित करण्यासाठी टिळकांनी सनातन्यांचा पक्ष घेतला, आपल्या अलौकिक वकिली बुद्धीने आपला धर्म, संस्कृती, इतिहास व समाजस्थिती यांचे प्रभावी समर्थन केले यात केवढी मोठी शोकांतिका दडलेली होती त्याचे आज आपणास स्पष्ट प्रत्यंतर येत आहे. रानड्यांच्या काळातच जी ऐतिहासिक गरज निर्माण झाली होती ती पूर्ण तर झाली नाहीच पण जे आव्हान फुल्यांनी उपस्थित केले होते त्याला अगदी चुकीचे उत्तर दिले गेले. वेदोक्ताचे प्रकरण हे ते ढळढळीत चुकीचे उत्तर होय.

धार्मिक विधी वेदोक्त पद्धतीने व्हावेत की पुराणोक्त याचे मोठे सुवेरसुतक वाटावे इतके परंपरानिष्ठ वा धर्मपरायण टिळक नव्हते. असे असताना त्यांनी हा वाद इतक्या हिरीरीने का घातला? कोल्हापूरच्या गादीचे मराठा इतिहासातील स्थान व महत्त्व यांची पूर्ण जाण टिळकांना होती. असे असूनही त्यांनी शाहू छत्रपतींशी भांडण का विकत घेतले? आपल्या अनुयायी वर्गाशी टिळकांची झालेली एकरूपता व पुढारी म्हणून त्यांच्या हक्क संरक्षणाची, समर्थनाची आपल्यावर घेतलेली जबाबदारी या गोष्टी टिळकांच्या वर्तनाच्या बुडाशी असल्या पाहिजेत. सुधारक काय किंवा त्यांचे प्रतिपक्षीय काय दोघांचेही 'मतदार' प्रामुख्याने ब्राह्मणच होते. ब्राह्मणांचा धर्माभिमान, त्यांचा गतकाळातील कर्तृत्वाविषयीचा अभिमान जागृत करून, तो पोसून त्यावर टिळकांनी आपल्या पुढारीपणाची उभारणी केली होती. पुढच्या काळात त्यांच्या नेतृत्वाची बैठक व कक्षा रुंदावत गेल्या तरी महाराष्ट्रात ब्राह्मणवर्ग हीच त्यांची एक मुख्य आधारशिला अखेरपावतो राहिली. हिंदू समाजांतर्गत ब्राह्मणांची, विविध धर्मीयांमध्ये हिंदूंची, राष्ट्राराष्ट्रांचा प्रश्न येईल तेथे हिंदुस्थानी लोकांची ते कड घेताना दिसतात. या ब्राह्मणवर्गाची प्रतिष्ठा, त्याचे हितसंबंध, त्याचे मनोबल, त्याचे संघटन जपणे हे टिळकांनी आपले कर्तव्य मानलेले दिसते. आपल्या पुढारीपणाची इमारत अंतिमतः या वर्गाच्या पायावर उभी आहे अशी त्यांची धारणा होती असे दिसते.

नेतृत्वाच्या उभारणीसाठी टिळकांनी खेळलेले डावपेच आणि महाराष्ट्रीय सामाजिक जीवनातली शोकांतिका यांचा असा सरळसरळ संबंध पोचतो. विष्णुशास्त्र्यांनी तरुण पिढीच्या ठिकाणी देशाभिमानाबरोबरच वर्गीय अहंकाराची भावना जोपासली, पण या भावनेस संघटित रूप प्राप्त झाले ते टिळकांच्या १८९० नंतरच्या राजकारणामुळे. टिळक पुढारीपणाच्या राजकारणात उतरण्यापूर्वी महाराष्ट्रात एक सुधारकपक्षच तेवढा संघटित होता. रानड्यांच्या सर्वांशी जुळवून घेण्याच्या स्वभावामुळे त्यांनी परंपरानिष्ठ मंडळींचा मान राखून काम करण्याचे धोरण शक्यतोवर ठेवले होते. त्यामुळे मतभेदाचे प्रसंग उद्भवूनही महाराष्ट्रात नव्या समाजकारणात व राजकारणात पक्षभेद निर्माण झालेले नव्हते. आपला वेगळा पक्ष केल्याशिवाय टिळकांना पुढारीपण मिळाले नसते असे मुळीच नाही; उदयोन्मुख पुढारी म्हणून वडीलधाऱ्यांनी त्यांना हेरले होते. पण प्रतिपक्षावर मात केल्याचे समाधान त्यांना मिळाले नसते. प्रतिपक्षावर मात करणे ही १८९० नंतरच्या काही वर्षांत टिळकांची मानसिक गरज होती. टिळकांनी आपला पक्ष दूरदृष्टीने, कौशल्याने आणि पद्धतशीरपणे बांधला. टिळकांच्या जीवनाचा पुरेसा तपशील या दृष्टीने उपलब्ध नाही. आठवणींच्या स्वरूपात तो काहीसा उपलब्ध आहे. तेवढ्यावरूनही त्यांनी पक्ष कसा बांधला असेल याची कल्पना येऊ शकत. पुढच्या काळात टिळकांच्या पक्षात भाविक व सनातनी मंडळी कमीच होती. अधिककरून नवशिक्षितच होते आणि हे नवशिक्षित आपल्या प्रत्यक्ष दैनंदिन व्यवहारात सुधारकीच होते. टिळकांनी त्यांना आपल्याकडे खेचून कसे घेतले? नव्या जमान्यात उपजीविकेच्या ज्या नव्या वाटा खुल्या झाल्या होत्या त्यांचा फायदा उठवून भरभराट करून घेणाऱ्या या आधुनिक हिंदी मध्यमवर्गातल्या सदस्यांना नव्यातले सोयीचे ते हवे होते, गैरसोयीचे ते नको होते. आपल्या ऐहिक यशाने आत्मसंतुष्ट बनलेल्या या मंडळींची भूक असलीच तर अधिक अधिकाराची, अधिक मोठ्या पगारदार नोकऱ्यांची होती. राजकीय हक्कप्राप्तीचे राजकारण त्यांना प्रिय होते कारण त्याने त्यांच्या सत्तेत, संपत्तीत, प्रतिष्ठेत भर पडणार होती. सामाजिक सुधारणेची नवसमाजरचनेची चळवळ त्यांना अप्रिय होती कारण त्यात आपले न्यून उघडे करावे लागत होते, (आज ना उद्या) इतरांनाही वर उचलण्याचा, सत्तेत वाटा देण्याचा प्रश्न होता. या उच्चवर्णीय मध्यमवर्गाचे सारेच प्रश्न टिळकांच्या भूमिकेत सुटत होते, त्यांचे हितसंबंध सर्वस्वी जपले जात होते. राजकीयदृष्ट्या सुधारक आणि सामाजिकदृष्ट्या जैसे थे भूमिका घेण्याचे बौद्धिक समर्थन टिळक आक्रमकरीत्या करीत होते व ही गोष्ट या वर्गाच्या स्वार्थाला सर्वस्वी पोषक होती. म्हणून टिळकांनी त्यांना खेचून घेतले. केसरी हे या वर्गाचे मुखपत्रच ठरले. केसरीला महाराष्ट्रभर इतक्या झपाट्याने एकनिष्ठ वाचक मिळाला त्याचे हे मोठे कारण आहे. केसरीमुळे हा वर्ग संघटित झाला व टिळक त्याचे पुढारी ठरले.

मग सुधारक काय करीत होते? या प्रश्नाचेही उत्तर पहाण्यासारखे आहे. सुधारक पक्षातही रानडे-आगरकर हे अपवादभूतच होते. बाकीच्या बहुतेक सुधारकांचे डोळे साहेबाच्या चालचलणुकीकडे आणि कान साहेबाच्या अभिप्रायाकडे लागलेले. आपण लोकांपासून पारखे होणार नाही याची दक्षता रानड्यांनी आयुष्यभर घेतली. त्यांच्या वागणुकीतल्या ‘कच्चे'पणापाठीमागे हे एक फार महत्त्वाचे सूत्र होते. रानड्यांच्या पश्चात लोकसंग्रह करणारा सुधारक नेता उरला नाही. लोकसंग्रह हे आपले काम नव्हे अशीच भूमिका सुधारकांनी घेतली. सुधारकांच्या कार्यक्रमपत्रिकेवरील एकेका बाबींना वाहून घेऊन कामांचे डोंगर उभे करणारे महर्षि कर्वे - देवधर यांच्यासारखे

सुधारक झाले तरी चळवळ अशी उरली नाही. टिळकपक्षीय नवशिक्षितही सोयीच्या सुधारणा पचनी पाडून घेत असल्याने, प्रारंभीच्या काळात ज्या सुधारणांवरून रणे माजली त्या सुधारणांसाठी चळवळ करण्याचे कारणही फारसे उरले नाही. म्हणजे एकंदर समाजाची सुधारणा करण्याची गरजच संपली असे नाही. व्यापक सामाजिक पुनर्घटनेचे सगळे प्रश्न शिल्लक उरले आहेत, हे मनोमन ओळखणारे कोणी सुधारक नव्हते असे म्हणण्यास आधार नाही. पण चळवळीची धुरा खांद्यावर घेण्याची ताकद असलेला कोणी सुधारक पक्षात उरला नव्हता. गोखले वा चंदावरकर यांच्यात ती ताकद कधीच नव्हती. त्यामुळे जोतिबांनी दिलेले आव्हान स्वीकारून, त्यांच्याशी हातमिळवणी करून ब्राह्मण-अब्राह्मणांची एकच सत्यशोधक चळवळ उभारण्याचे काम सुधारकांकडून झाले नाही. त्यांच्याकडून ते होण्यासारखेच नव्हतेच.

त्यावेळच्या महाराष्ट्रात रानड्यांनंतर ही ताकद एका टिळकांमध्येच होती. लोकसंग्रहाचे कसब त्यांच्या ठिकाणी होते त्याबरोबर सामाजिक व राजकीय कार्य जनसामान्यांमध्ये पसरविले पाहिजे याची जाणीवही होती. म्हणजे जोतिबांचे आव्हान जो समर्थपणे व विधायकरीत्या स्वीकारू शकला असता असा एकमेव पुरुष दुर्दैवी योगायोगाने सुधारणेच्या प्रतिपक्षाचा नेता होऊन बसला होता. टिळक खरोखर सनातनी निष्ठेचे असते तर याविषयी आपण हळहळणे अप्रस्तुत ठरले असते. वस्तुस्थिती उलट होती. "सामाजिक बाबतींच्या मतांत ते आमच्याइतके सुधारक आहेत, हे मी खातरीने सांगतो,"[४] हे रानड्यांचे उद्गार सार्थ होते. महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासात घडलेल्या या घटनेला शोकांतिकेचे परिमाण प्राप्त होते ते या विपरीत न्यायामुळे.

ही जुनी मढी कशाला उकरून काढावयाची, हा प्रश्नही अनेकांना पडू शकतो. प्रस्तुत लेखमाला प्रसिद्ध होत असताना काही मित्रांनी हा प्रश्न केलाही. महाराष्ट्रीय समाज आजही एकरस झालेला नाही. ब्राह्मण, मराठा व महार या तीन वेगवेगळ्या कारणांनी प्रमुख अशा लोकांत आजही परस्पर विश्वास व सौहार्द नाही. किंबहुना हे तणाव आजही चांगलेच तीव्र आहेत. या परिस्थितीत फरक पडेपर्यंत महाराष्ट्रात नवसमाजनिर्मिती अशक्य आहे. या परिस्थितीत फरक घडून येण्यासाठी या तिन्ही घटकांनी आत्मपरीक्षण करण्याची, व आपल्या अलीकडच्या वारशातील अनिष्ट भाग त्यागण्याची आवश्यकता आहे. ब्राह्मणवर्गाच्या संदर्भात बोलावयाचे तर काँग्रेस व काँग्रेसेतर, तसेच राजकीयदृष्ट्या अलिप्त राहिलेल्या सर्वांचेच मानस टिळकांनी घडविलेले आहे असे दिसून येईल. रानडे - आगरकर आदींचा प्रभाव असलाच तर महाराष्ट्रीय समाजजीवनापासून दूर पडलेल्या एका अत्यल्प गटापुरता असेल. महाराष्ट्रातील अलीकडील डाव्या पुरोगामी (यात गांधींच्या अनुयायांचा समावेश या मुद्द्यापुरता करावयास हरकत नाही) चळवळींमधील व्यक्तींच्या बाबतीतही वैयक्तिक सन्माननीय अपवाद सोडता हीच गोष्ट खरी आहे. टिळकांच्या कर्तृत्वाचीच ही पावती आहे हे खरे. त्यांचे कर्तृत्व आणि त्यांचे इतर क्षेत्रातले महनीय कार्य न नाकारता त्यांच्याकडून चालत आलेला हा वारसा निःसंदिग्धपणे टाकून देण्याची वेळ आलेली आहे हेही खरे.

टिळकांच्या व्यक्तिमत्वाचे, कार्याचे, भूमिकेचे नव्याने मूल्यमापन न करताच, वेगळया शब्दांत सांगावयाचे तर काही प्रमाणात टिळकांचा अव्हेर न करताच, गुपचूपपणे, हे करता येणार नाही का? या प्रश्नाचे उत्तर स्पष्टपणे 'नाही' असे

दिले पाहिजे. गतइतिहासात केलेल्या घोडचुकांची, पापांची स्पष्ट प्रामाणिक कबुली ही किंमत चुकविल्याखेरीज सामाजिक वैमनस्यांवर मात करावयास आपण सुरुवातही करू शकणार नाही. टिळक आणि टिळकांचा केसरी ही महाराष्ट्राची दैवते होती व आजही एका वर्गात त्यांना जवळपास तेच स्थान अनेकांच्या मनात आहे. टिळक हे फार मोठ्या श्रेयाचे धनी असत्याने ते मान्याचे प्रमुख लक्ष्यही ठरतात. कारण ते एक व्यक्ती रहात नाहीत, ते एक प्रतीक ठरतात. टिळक हे साऱ्या महाराष्ट्राकडून स्वीकारले जायला हवे आहेत, पण तसे घडून येण्यासाठी त्यांचे मानुषीकरण व्हायला हवे. हाच न्याय इतरही 'देवतां'ना लागू पडतो हे वेगळे सांगण्याची गरज नाही.

राजकीय कार्याच्या गरजांपोटी टिळकांनी सामाजिक सुधारणेबाबत विशिष्ट भूमिका घेतली असे म्हणण्यात सोयीस्कर सारवासारव आहे. टिळकांकडून जे गैर घडले ते गैर होते हे नाकारण्यासारखे आहे. त्यांच्या गैरकृत्यांचे दुष्परिणाम आपण भोगत असतानाच त्यांच्या मुळांवर पांघरूण घालू पहातो, त्यांचे समर्थन करू पहातो. हे करून आपण केवळ टिळकांना वाचवीत असतो तरी बिघडत नव्हते. पण त्यांचे समर्थन करण्याचाच एक अर्थ असा असतो की, आजवर आम्ही उच्चवर्गीय - म्हणजे मुख्यतः ब्राह्मणवर्ग - जसे वागलो त्यात चूक काहीच नव्हते; आम्ही बरोबरच वागत आलो, इतरांनीच उगीच हाकाटी चालविली आहे. ती त्यांनी थांबवावी, समंजसपणा दाखवावा. हिंदू धर्म म्हणजे त्याचे ब्राह्मणी कर्मकांडात्मक रूप चांगलेच आहे, तो सर्व धर्मांमध्ये श्रेष्ठ धर्म आहे, आमची आर्यसंस्कृती काही क्षुल्लक व किरकोळ त्रुटी सोडता आदर्श व परिपूर्ण आहे, असा त्याचा अर्थ असतो. आणि हा अर्थ इतरांना बरोबर कळतो. आमचे चुकले पण टिळकांचे बरोबरच होते असे म्हणण्यास सवड नाही ही गोष्टही लक्षात घेतली पाहिजे. आणि टिळकांचा वारसा हा आजही जिवंत व प्रभावी आहे ही गोष्टही विसरून चालणार नाही. टिळकांच्या कार्याच्या या अंगाला सरळसरळ सामोरे जाण्याखेरीज गत्यंतर नाही.

असे सामोरे गेले म्हणजे काय आढळते हे पहाण्याचा प्रस्तुत लेखमालेत प्रयत्न केला आहे. टिळकांची सोयीने व चलाखीने सुटका करावयाची नाही असे एकदा ठरविले की, सूक्ष्मदर्शक भिंगातून बघूनही 'राजकीय कार्याची गरज' अमूक एक होती असे दृष्टोत्पत्तीस येत नाही. संस्कृतीवरील, धर्मावरील हल्ले परतविण्यासाठी देखील टिळकांनी घेतलेल्या भूमिकेची गरज होती असे म्हणणे कठीण आहे. हिंदू धर्माचे, संस्कृतीचे व इतिहासाचे उज्ज्वल स्वरूप पुढे आणण्याचे कार्य करणारांमध्ये टिळकांची गणना होत नव्हती तेव्हा सुधारकपक्षातील अनेकांनी ते कार्य जोमाने चालविले होते, ही वस्तुस्थिती तसे म्हणण्याच्या आड उभी राहते. ही भ्रमपटले दूर झाली म्हणजे जे दृष्टीस पडते ते ईर्षेने प्रतिपक्षाला नामोहरम करण्याचे, चीतपट करण्याचे, पुढारीपण हिसकावून घेण्याचे सत्तेचे राजकारण आणि त्या ओघात खेळले गेलेले डावपेच या ईर्षेने पेटल्यामुळेच टिळकांना आपण खेळत असलेल्या कमअस्सल राजकीय डावपेचांच्या व्यापक व दूरगामी दुष्परिमाणांची जाणीव झाली नाही. १९१६ नंतरच्या काळात जेव्हा परिस्थितीने त्याची जाणीव त्यांना तीव्रपणे करून दिली तेव्हा आपणच बांधलेल्या तटबंदी फोडण्याइतके धैर्य त्यांना करवले नाही. त्यांना आपला मृत्यू जवळ आलेला दिसत होता, आणि आयुष्याची नव्याने मांडणी करण्याइतकी उमेद त्यांना वाटली नसली तर ते स्वाभाविक आहे. सामाजिक इतिहासाच्या अंगाने पाहिले तर, राजकीय क्षेत्रातल्या यशाच्या अत्युच्च क्षणी

टिळकांना महाराष्ट्रात मोठा पराभव पत्करावा लागला असे आढळते : पुण्यात त्यांना मानपत्र देण्याच्या प्रसंगी त्यांच्या लोकमान्यतेच्या निरुंद कक्षा स्पष्ट झाल्या. त्यांच्या सामाजिक सुधारणाविषयक भूमिकेच्या पोटी त्यांना घ्याव्या लागलेल्या पवित्र्यांना लागलेली कडू फळे एव्हाना पिकू लागली होती.

अखेरीस टिळकांचा पराभव टिळकांच्या अनुयायांनीच केला ही खरी दारुण शोकांतिका आहे. १९१४ नंतरच्या काळात टिळकांच्या भूमिकेत फार मोठे परिवर्तन घडून आल्याचे आढळते. पण त्यांचे अनुयायी त्याच जुन्या काळात वावरत होते. गोखल्यांच्या अंत्यसंस्कारांसाठी टिळक सिंहगडावरून लगोलग आले तेव्हाची रामकृष्ण पंत पराडकरांची आठवण बोलकी आहे. "आम्ही मंडळी चित्रशाळेजवळच बसायची ना?" या त्यांच्या (पंत पराडकरांच्या शब्दांत) ‘एकदोन प्रतिष्ठित अनुयायां"नी केलेल्या प्रश्नावर टिळकांना त्यांना फटकारावे लागले की, "का? तेथवर आलात तर पाय दुखतील की काय? गोखल्यांसारख्या देशभक्तास एवढा अखेरचा मान तरी द्या की."[५] काँग्रेसच्या क्रीडवर सही करून काँग्रेसमध्ये राष्ट्रीय पक्षाने शिरावे हा निर्णयही लोकमान्यांना आपल्या अनुयायांवर जवळजवळ लादावा लागला. कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांच्या पत्रकावर सही करण्याचे टिळकांना नाकारावे लागले ते आपल्या अनुयायांपोटीच. पण हा अनुयायी वर्ग सर्वार्थाने त्यांनीच घडविला होता, संघटित केला होता, बलिष्ठ केला होता. त्यानेच लोकमान्यांना अखेरीस पराभूत केले.

आजही लोकमान्य त्यांच्याच कैदेत आहेत असे विचारांती लक्षात येईल. लोकमान्यांची त्यांनी एक अधिकृत प्रतिमा बनवून ठेवली आहे आणि तिला ते प्राणांपलीकडे जपत असतात. लोकमान्यांची थोरवी इतकी आहे की त्यांना या अधिकृत प्रतिमेच्या संरक्षणाची गरज नाही. पण संरक्षणाची गरज या त्यांच्या अनुयायांना मात्र आहे. कारण त्यांनी लोकमान्यांचा केलेला पराभव एरवी झाकला जाणार नाही. आणि तो झाकला गेला नाही तर यांचे पितळ उघडे पडल्याशिवाय रहाणार नाही. पण महाराष्ट्राच्या उज्ज्वल भवितव्यासाठी त्यांनी माजविलेल्या देव्हाऱ्यातून टिळकांची सोडवणूक करण्याची नितांत गरज आहे.[*]

* गांधींबद्दलही आपणास जवळजवळ अगदी असेच म्हणता येईल ही लक्षात घेण्याजोगी गोष्ट आहे.

१. स. वि. बापट, लो. टिळकांच्या आठवणी व आख्यायिका, खंड २, स. वि. बापट, पुणे, १९२४, पृ. १७२.
२. कित्ता, खंड २, पृ. ६५०.
३. कित्ता खंड १, पृ. २८०.
४. कित्ता, खंड १ पृ. २७१, दामोदर सावळाराम यंदे यांची आठवण.
५. कित्ता, खंड ३, पृ. २६५.